**महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत प्रशासकीय मंजूरी देण्यात आलेल्या पाणी पुरवठा व मलनि:स्सारण योजनांना अनुदान वितरीत करण्याबाबत.**
**देवळी नगर परिषद, जि. वर्धा**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सुनिअ-२०१३/प्र.क्र.४९४/पापु.२२**
गोकुळदास तेजपाल हॉस्पिटल संकुल इमारत, लोकमान्य टिळक मार्ग
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: ११ ऑक्टोबर, २०१८

वाचा :

**१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. नापापु-२००८/प्र.क्र.१/पापु-२२,दि. २२.१०.२००८**
**२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.नापापु-२००८/प्र.क्र.१९८/पापु-२२, दि.२३.१२.२००८**
**३) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,क्र.सुनिअ-२०११/प्र.क्र.५७५/पापु-२२, दि.१९.१०.२०११**
**४) शासन शुध्दीपत्रक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.सुनिअ-२०११/प्र.क्र.५७५/पापु-२२, दि.१९.११.२०१२**
**५) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा विभाग, पुणे यांचे पत्र क्र.मु.अ./प्रव्यससे/पुणे/तांशा-२/१३२/२०१३, दिनांक २१.०१.२०१३**
**६) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. सुनिअ-२०१३/प्र.क्र.४९४/पापु-२२, दिनांक २३.१०.२०१३**
**७) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. सुनिअ-२०१३/प्र.क्र.४९४/पापु-२२, दिनांक १७.०६.२०१५**
**८) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र.सुनिअ-२०१३/प्र.क्र.४९४/पापु-२२, दिनांक १९.०८.२०१६**
**९) अधिक्षक अभियंता, म.जी.प्रा.मंडळ, चंद्रपूर यांचे पत्र क्र. मजीप्रामंच/लेशा-१/१४९९/२०१८, दिनांक १०.०७.२०१८**

**प्रस्तावना :**

शासन निर्णय, दि.२२ ऑक्टोबर, २००८ अन्वये नागरी पाणीपुरवठा, मलनि:सारण, शौचालय बांधकाम व घनकचरा व्यवस्थापनासंदर्भात पर्याप्त, गुणवत्तापूर्ण सेवा, किफायतशीर सेवाशुल्कामध्ये उपलब्ध करुन देणे व विविध तांत्रिक, आर्थिक व व्यवस्थापकीय सुधारणा करण्याचे उद्दीष्ट निर्धारीत करुन महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान राबविण्यात येत आहे. राज्यातील सर्व नागरीकांना पाणी पुरवठा व मलनि:सारणाच्या सर्वव्यापक सुविधा निश्चितपणे उपलब्ध करुन देणे हा महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानाचा मुख्य उद्देश आहे.

२. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत, शासन निर्णय, दिनांक १९.१०.२०११ अन्वये देवळी शहर पाणी पुरवठा योजनेच्या एकूण रु. ३४,०२,०२,०००/- इतक्या ढोबळ किंमतीच्या भांडवली कामांस प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तसेच मंजूर भांडवली कामे महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत राबविण्याबाबतचा निर्णय, शासन शुध्दीपत्रक, दिनांक १९.११.२०१२ अन्वये घेण्यात आला आहे. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा, पुणे यांनी संदर्भ क्र.५ अन्वये एकूण रु. २९,५०,१६,३३५/- इतक्या निव्वळ किंमतीच्या भांडवली कामांस तांत्रिक मंजूरी दिली आहे. शासन शुध्दीपत्रक, दिनांक १९.११.२०१२ प्रमाणे मंजूर

आकृतिबंधाप्रमाणे देवळी नगर परिषद तसेच औद्योगिक संस्थेने सहभागाची एकूण रक्कम रु. ३,४०,२०,२००/- पैकी रुपये २,०६,००,०००/- इतकी रक्कम बँक खात्यामध्ये जमा केले आहेत. सदर योजनेकरीता संदर्भ क्र. ६,७ व ८ अन्वये एकूण रुपये १५८४.०० लक्ष अनुदान कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, वर्धा यांना वितरीत करण्यात आले आहे. कार्यकारी अभियंता, म.जी.प्रा.विभाग, वर्धा यांनी एकूण १८११.५५ लक्ष रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र तसेच मंजूर भांडवली कामांचा प्रगती अहवाल (८३.८६%) सादर केला असून योजनेस अनुज्ञेय अनुदानापैकी उर्वरित अनुदान वितरीत करण्याची विनंती केली आहे. सदर बाबी विचारात घेता, देवळी नगर परिषद तसेच औद्योगिक संस्थेने सहभागापोटी जमा केलेल्या एकूण २०६.०० लक्ष सहभागाच्या रकमेच्या प्रमाणात देवळी शहर पाणी पुरवठा योजनेच्या भांडवली कामांस अनुज्ञेय अनुदानापैकी रुपये १५०.०० लक्ष अनुदान कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, वर्धा यांना वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत, शासन निर्णय, दिनांक १९.१०.२०११ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या देवळी शहर पाणी पुरवठा योजनेच्या भांडवली कामांकरीता एकूण अनुज्ञेय अनुदानापैकी रुपये १,५०,००,०००/- ( रुपये एक कोटी पन्नास लाख फक्त ) इतके अनुदान पुढील विवरणानुसार वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

( रक्कम रुपयांत )

| शहराचे नांव | योजनेची एकूण किंमत | अनुज्ञेय अनुदान (९०%) | नागरी संस्थेचा सहभाग (१०%) | | नागरी संस्थेने भरलेली रक्कम | यापुर्वी वितरीत करण्यात आलेले अनुदान | आता वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | नागरी संस्था | औद्योगिक संस्था | | | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| देवळी नगर परिषद | ३४,०२,०२,००० | ३०,६१,८१,८०० | २,२८,०७,००० | १,१२,१४,००० | २,०६,००,००० | १५,८४,००,००० | १,५०,००,००० |
| | | | | | | **एकुण रुपये** | **१,५०,००,०००** |

२. सदर योजनेअंतर्गत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुज्ञेय होणाऱ्या सदर अनुदानावरील खर्च मागणी क्रमांक वाय-२, २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा १९२, स्थानिक संस्था, नगर पालिका इत्यादींना सहाय्य - राज्य योजना - (०२) (०२) नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था) पाणी पुरवठा व जलनि:स्सारण योजनांसाठी सहायक अनुदान (२२१५ १६४७), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली करण्यात आलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था यांनी सदर लेखाशिर्षाखाली शासनाकडून उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानातून उक्त विवरणपत्रातील नमूद स्तंभ क्रमांक ८ मध्ये दर्शविल्याप्रमाणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना/कार्यकारी अभियंता, म.जी.प्रा.विभाग, वर्धा यांना अनुदान वितरीत करावे, तसेच अनुदानाच्या या वितरणाचे स्वतंत्र लेखे ठेवावेत.

३. संबंधीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेने योजनेसाठी स्वतंत्र लेखे ठेवावेत आणि योजनेचा प्रगती अहवाल व उपयोगीता प्रमाणपत्रे नियमितपणे वेळोवेळी शासनास सादर करावी.

४. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत शासकीय अनुदान प्राप्त करुन घेण्यासाठी संबंधीत नागरी संस्थानी शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक- नापापु २००८/प्र.क्र.१/पापु-२२, दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ मधील तरतूदीचा अवलंब करणे आवश्यक राहील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१८१०१११७२१४६९६२८** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sunil Jairam Tumram

Digitally signed by Sunil Jairam Tumram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=873e6409c70b0a0219d717dd6767c9aec9dd2d61ecf0cc982e9e93ef57312675, cn=Sunil Jairam Tumram
Date: 2018.10.12 11:42:39 +05'30'

**( सु.ज. तुमराम )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

- मा.मंत्री, (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
- मा.राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
- मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, यांचे खाजगी सचिव, विधानमंडळ सचिवालय, मुंबई
- मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, यांचे खाजगी सचिव,विधानमंडळ सचिवालय, मुंबई
- अपर मुख्य सचिव (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
- महालेखापाल १ -मुंबई/नागपूर.
- विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर
- सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
- संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई.
- जिल्हाधिकारी, वर्धा
- संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
- संचालक (वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
- मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा विभाग, पुणे.
- अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, चंद्रपूर
- कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, वर्धा
- जिल्हा प्रकल्प अधिकारी ( नगरपालिका ), जिल्हाधिकारी कार्यालय, वर्धा

- जिल्हा कोषागार अधिकारी, वर्धा
- मुख्याधिकारी, देवळी नगर परिषद, जि. वर्धा
- वित्त विभाग/नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
- कक्ष अधिकारी, पापु.०४,पापु-०५, पापु.२०,पापु.२१, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
- निवडनस्ती, पापु-२२.